**राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम सिगारेट व अन्य तंबाखू उत्पादने कायद्याच्या, २००३ (COTPA) प्रभावी अंमलबाजवणीसाठी तालुकास्तरीय समन्वय व संनियंत्रण समिती स्थापन करणे बाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः तंनिका-२१२३/प्र.क्र.८५/आ-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत ८ व १० वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१
तारीख: १० जुलै, २०२३

**वाचा :**

१) सिगारेट व अन्य तंबाखू उत्पादने (जाहिरात, प्रतिबंध व व्यापार, वाणिज्य, उत्पादन, पुरवठा व वितरण याचे विनियमन ) कायदा, २००३.

२) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांनी राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमा संदर्भात निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्व (Operational Guidelines) २०१५.

३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : तंबाखू बैठक २०१२/प्र. क्र. २६१/ आरोग्य -५ दिनांक २९.०६.२०१७.

४) मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दि. ३०.०९.२०२२ रोजीची घेण्यात आलेल्या राज्यस्तरीय तंबाखू नियंत्रण समितीची बैठकीचे मान्य इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने दिनांक १९ मे २००३ च्या राजपत्राद्वारे सिगारेट व अन्य तंबाखू उत्पादने (जाहिरात, प्रतिबंध व व्यापार, वाणिज्य, उत्पादन, पुरवठा व वितरण याचे विंनियमन ) कायदा, २००३ (COTPA) संपूर्ण देशात लागू केला आहे. सदर अधिनियम १ मे २००४ पासून अंमलात आलेला आहे. त्यानंतर ११ व्या पंचवार्षिक योजनेअंतर्गत सन २००७-०८ मध्ये “राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम” लागू केलेला आहे. संदर्भ क्रमांक ४ नुसार आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांनी सन २००३ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार राज्यात “सिगारेट व अन्य तंबाखू उत्पादने (COTPA) कायदा २००३” व “राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम” यांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी मा. मुख्य सचिव, यांचे अध्यक्षतेखाली राज्यस्तरावर राज्यस्तरीय समन्वय समिती (SLCC) व जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय समन्वय समिती ( DLCC) स्थापन करण्यात आलेली आहे. त्यानुसार तालुका व गावपातळीवर या कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी व्हावी यासाठी तहसिलदार यांचे अध्यक्षतेखाली तालुका स्तरीय समन्वय समिती (TLCC) स्थापन करण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सिगारेट व अन्य तंबाखू उत्पादने (जाहिरात, प्रतिबंध व व्यापार, वाणिज्य, उत्पादन, पुरवठा व वितरण याचे विनियमन ) कायदा, २००३ व राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी वरील संदर्भ क्रमांक ४ नुसार तालुकास्तरीय समन्वय समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

समितीची रचना खालील प्रमाणे राहील. :-

१) तहसिलदार - अध्यक्ष
२) तालुका आरोग्य अधिकारी - सदस्य सचिव
३) गट विकास अधिकारी - सदस्य
४) पोलिस निरीक्षक (मुख्यालय) - सदस्य
५) वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय/उपजिल्हा रुग्णालय - सदस्य
६) प्राचार्य, समाजकार्य महाविद्यालय - सदस्य
७) स्थानिक तरुण मंडळ/सामाजिक कार्यकर्ता - सदस्य
८) सामाजिक संस्थेचा प्रतिनिधी - सदस्य

२. वरील अनुक्रमांक ६ ते ८ येथे नमूद अशासकीय सदस्यांची निवड सदस्य सचिवांच्या शिफारशीनुसार समिती अध्यक्ष करतील. (जिथे समाजकार्य महाविद्यालय नाही अशा ठिकाणी प्रसंगानुरुप कार्यवाही करावी. उदा. समाजशास्त्र विषयाचा प्राध्यापक)

३. तंबाखू नियंत्रण हा विषय फक्त आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील विषय नाही. हा विषय अनेक विभागांशी संबंधित असून, अनेक विभागांमध्ये एकमेकास पूरक व विविध मुद्दयाशी संबंधित आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार प्रत्येक विभागाची भूमिका खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र . | विभाग | भूमिका |
|---|---|---|
| १) | तहसिलदार | **अध्यक्ष** |
| २) | तालुका आरोग्य अधिकारी | **सदस्य सचिव**<br>१.तालुकास्तरीय समन्वय समितीच्या बैठकींचे आयोजन करणे.<br>२.राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रमाचे नियमित सनियंत्रण, पर्यवेक्षण, पुनरावलोकन, देखरेख ठेवणे व जनजागृती विषयी समन्वय साधणे. |
| ३) | गट विकास अधिकारी | **सदस्य**<br>१. ग्रामीण भागातील त्रिस्तरीय पंचायतराज संस्थांमधील निर्वाचित सदस्यांना (COTPA) |

| अ.क्र . | विभाग | भूमिका |
|---|---|---|
| | | २००३ कायद्याच्या अंमलबजावणी बाबत अवगत करणे व सहकार्य मिळविणे.<br>२. ग्रामीण भागात आरोग्य आणि विकास कार्यक्रमासोबत राष्ट्रीय तंबाखू नियंत्रण कार्यक्रम आणि (COTPA) २००३ कायदा अंमलबजावणीसाठी सहाय्य करावे.<br>३. विडी कामगारांना उदरनिर्वाहासाठी पर्यायी साधन उपलब्धते विषयी आंतरविभागीय समन्वयातून प्रयत्न व जनजागृती करणे. |
| ४) | पोलिस निरीक्षक | **सदस्य**<br>१. तालुक्यातील पोलिस दलातील अधिकारी व कर्मचारी यांना सिगारेट व अन्य तंबाखू उत्पादने कायदा, (COTPA) २००३ च्या प्रभावी अंमलबजावणी बाबत प्रशिक्षणासाठी समन्वय साधणे व कार्यवाहीस्तव पाठपुरावा करणे.<br>२. गुन्ह्यांच्या मासिक आढावा बैठकीच्या वेळी नियमितपणे COTPA २००३ च्या अंमलबजावणीचा आढावा घेणे.<br>३. COTPA २००३ कायद्यातील तरतुदींच्या उल्लंघनाबाबत नियमितपणे आकडेवारी गोळा करण्याच्या सूचना देणे व सदरचा अहवाल जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय - सदस्य सचिव, अध्यक्ष-जिल्हा तंबाखू नियंत्रण समिती यांना दरमहा ५ तारखेपर्यंत सादर करणे. |
| ५) | वैद्यकीय अधीक्षक, ग्रामीण रुग्णालय/उपजिल्हा रुग्णालय | **सदस्य**<br>१. सिगारेट व अन्य तंबाखू उत्पादने कायदा, २००३ (COTPA) च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी आंतरविभागीय समन्वयातून पथके तयार करणे.<br>२. तंबाखू व तंबाखूजन्य उत्पादनाच्या वापरामुळे होणा-या दुष्परिणामाबाबत तसेच COTPA २००३ कायद्यातील तरतुदीबाबत संपूर्ण तालुक्यात विभागामार्फत तसेच सामाजिक |

| अ.क्र . | विभाग | भूमिका |
|---|---|---|
| | | सेवाभावी संस्थांच्या मदतीने जनजागृती शिबिरे आयोजित करणे.<br>३. स्थानिक कार्यक्रम, मेळावे इत्यादी गर्दीच्या ठिकाणी आरोग्य विषयक माहिती, आरोग्य शिक्षण आणि संवादाकरिता जनजागृतीची साधने विकसित करणे.<br>४. तालुका स्तरावर स्थानिक कार्यक्रमात, मेळाव्यांमध्ये तंबाखू विरोधी संदेशाबाबतची साधनसामुग्री पुरविणे.<br>५. तंबाखू व्यसनमुक्ती केंद्राचा अहवाल व कार्यवाही विषयी समितीस अवगत करणे.<br>६. तालुक्यातील सेवाभावी संस्था व समाजकल्याण विभागामार्फत कार्यान्वित असणा-या व्यसनमुक्ती केंद्राचे (De-Addiction Center) पर्यवेक्षण करणे. |
| ६) | प्राचार्य, समाजकार्य महाविद्यालय | **सदस्य**<br>तालुका स्तरावर व्यसनमुक्ती / तंबाखूमुक्ती धोरण व COTPA २००३ कायदा अंमलबजावणीसाठी सामाजिक उपक्रमामध्ये सहकार्य करणे. |
| ७) | स्थानिक युवा मंडळ/सामाजिक कार्यकर्ते | **सदस्य**<br>स्थानिक कार्यक्रम, मेळावे इत्यादी आरोग्य विषयक माहिती आणि संवाद याबाबत जनजागृतीचे कार्यक्रम आयोजित करण्यासाठी संबंधीत यंत्रणेस सहकार्य करणे. |
| ८) | आरोग्य व तंबाखू नियंत्रण या क्षेत्रात काम करणारी स्वयंसेवी संस्था. | **सदस्य**<br>१. स्थानिक कार्यक्रम, मेळावे इत्यादी आरोग्य विषयक माहिती आणि संवाद याबाबत जनजागृतीचे कार्यक्रम आयोजित करण्यासाठी संबंधीत यंत्रणेस सहकार्य करणे. |

संदर्भीय प्रशासकीय विभागांनी त्यांच्या क्षेत्रीय यंत्रणेस निर्देश देण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६३०२२३८५४६६१७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.07.10 12:48:11 +05'30'

**अशोक आत्राम**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, कृषी, पशुसंवर्धन,दुग्धविकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सचिव, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१३.आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१४.आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, वाद्रे-कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (पू), मुंबई.
१५.व्यवस्थापक, मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी टर्मिनस, मुंबई.
१६.व्यवस्थापक, पश्चिम रेल्वे, चर्चगेट, मुंबई.
१७.जिल्हाधिकारी, (सर्व)
१८.संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
१९.सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्य रोग - तनिका), मुंबई.

२०.उपसंचालक, आरोग्य सेवा, परिमंडळ, सर्व.
२१.जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय (सर्व)
२२.जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२३.तहसिलदार (सर्व)
२४.तालुका आरोग्य अधिकारी (सर्व)

प्रत माहितीसाठी :-

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (सा.आ.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. सहसचिव (आरोग्य-५), सार्वजनिक आरोग्य विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (आरोग्य-५)